भोसला मिलीटरी स्कूल, नाशिक या संस्थेतील अधिकारी/कर्मचारी यांना सातव्या वेतन आयोगाच्या शिफारशीनुसार सुधारीत वेतन संरचना लागू करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : ईसैशा-२०१९/प्र.क्र.१०२/एसएम-६,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- ०८ जून, २०२३

वाचा :- १) शासन निर्णय शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र. भोमिस्कू-२००९/प्र.क्र.९९/माशि-७, दिनांक ०१.०६.२०१२
२) शासन निर्णय शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र. वेतन-१२१९/प्र.क्र.१९/टीएनटी-३, दिनांक २२.०२.२०१९
३) शासन निर्णय वित्त विभाग क्र. वेपूर-२०१८/प्र.क्र.४४/सेवा-९, दि. ०१.०१.२०१९
४) शासन निर्णय वित्त विभाग क्र. वेपूर-२०१९/प्र.क्र.१/सेवा-९, दि. ३०.०१.२०१९
५) शासन निर्णय वित्त विभाग क्र. वेपूर-२०१९/प्र.क्र.८/सेवा-९, दि. २०.०२.२०१९
६) शासन निर्णय वित्त विभाग क्र. वेपूर-२०१९/प्र.क्र.१५/सेवा-९, दि. १४.०५.२०१९
७) शासन निर्णय वित्त विभाग क्र. वेपूर-२०१९/प्र.क्र.८/सेवा-९, दि. ३०.०५.२०१९

**प्रस्तावना :-**

संदर्भाधीन शासन निर्णय क्र (१) अन्वये भोसला मिलीटरी स्कूल, नाशिक या संस्थेतील सर्व पदांना सहाव्या वेतन आयोगाच्या शिफारशी नुसार सुधारीत वेतन श्रेणी लागू करण्यात आलेली आहे.

संदर्भाधीन शासन निर्णय क्र.(२) अन्वये भोसला मिलीटरी स्कूल, नाशिक या संस्थेतील सर्व पदांना सातव्या वेतन आयोगाच्या शिफारशीनुसार सुधारीत वेतन श्रेणी लागू करण्यात आली आहे. तथापि, सदर संस्थेतील (१) समादेशक (२) चीफ ट्रेनिंग ऑफिसर (३) ट्रेनिंग ऑफिसर (४) असिस्टंट ट्रेनिंग ऑफिसर (५) मेस मॅनेजर या पदांना सातव्या वेतन आयोगाच्या शिफारशीनुसार सुधारित वेतनश्रेणी लागू करण्यात आली नसल्यामुळे त्या पदांना सातव्या वेतन आयोगाच्या शिफारशीनुसार सुधारित वेतनेश्रेणी लागू करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

शासन आता असा आदेश देत आहे की, भोसला मिलीटरी स्कूल, नाशिक या संस्थेतील (१) समादेशक (२) चीफ ट्रेनिंग ऑफिसर (३) ट्रेनिंग ऑफिसर (४) असिस्टंट ट्रेनिंग ऑफिसर (५) मेस मॅनेजर या पदांना खालील विवरण पत्रात नमूद केल्याप्रमाणे सातव्या वेतन आयोगाच्या शिफारशीनुसार खालील अटींच्या अधीन राहून सुधारित वेतनश्रेणी लागू करण्यास शासन मंजूरी देत आहे.

| अ.क्र. | पदनाम | सहाव्या वेतन आयोगाची वेतन संरचना | ग्रेडवेतन | सातव्या वेतन आयोगाची वेतन संरचना |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | समादेशक(कमांडंट) | १५६००-३९१०० | ७६०० | S-२५ (७८८००-२०९२००) |
| २ | चिफ ट्रेनिंग ऑफिसर | ५२००-२०२०० | २८०० | S-१० (२९२००-९२३००) |
| ३ | टेनिंग ऑफिसर | ५२००-२०२०० | २००० | S-७ (२१७००-६९१००) |
| ४ | असिस्टंट ट्रेनिंग ऑफिसर | ५२००-२०२०० | २००० | S-७ (२१७००-६९१००) |
| ५ | मेस मॅनेजर | ५२००-२०२०० | २००० | S-७ (२१७००-६९१००) |

(१) उपरोक्त पदांना सुधारित वेतनश्रेणीमधील वेतननिश्चिती शासन निर्णय क्रमांक वेतन १२१९/ प्र.क्र.१९/टीएनटी-३, दिनांक १२ जून, २००९ च्या शासन निर्णयानुसार तसेच शासनाने वेळोवेळी सुधारित केलेल्या नियमानुसार करण्यात यावी व त्याप्रमाणे थकबाकी अदा करण्याबाबत कार्यवाही करण्यात यावी.

(२) सुधारीत वेतनरश्रेणीमधील संबंधित वेतन निश्चिती केल्यानंतर तपासणी अंती वेतन निश्चितीमुळे संबंधितांस अतिप्रदान झाल्यास ते संबंधितांकडून वसूल करण्यात येईल. तसेच वचनपत्र संबंधितांकडून घेण्यात यावे.

(३) सुधारित वेतन संरचनेत वेतन निश्चिती करण्यासाठी आवश्यक तो विकल्प हे आदेश निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून २ महिन्यांच्या आत देण्यात यावा. एकदा दिलेला विकल्प अंतिम राहील.

(४) या सुधारित वेतन श्रेणमुळे होणारा अतिरिक्त खर्च भोसला मिलीटरी स्कूल या संस्थेच्या कर्मचा-यांच्या वेतन व भत्ते या संबंधीचा खर्च ज्या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात येतो, त्या लेखाशार्षीखाली खर्ची टाकण्यात यावा.

४. सुधारित वेतन संरचनेतील वेतनिश्चिती आणि त्यानुषंगाने अनुज्ञेय थकबाकीचे प्रदान संदर्भाधीन क्रमांक ४ येथील शासन अधिसूचना, वित्त विभाग, दिनांक ३० जानेवारी, २०१९; संदर्भाधीन क्र. ५ येथील शासन परिपत्रक, वित्त विभाग, दिनांक २० फेब्रुवारी, २०१९; संदर्भाधीन क्र. ६ येथील शासन परिपत्रक, वित्त विभाग, दिनांक १४ मे, २०१९; संदर्भाधीन क्र. ७ येथील शासन परिपत्रक, वित्त विभाग, दिनांक ३० मे, २०१९ मधील तरतुदीनुसार करण्यात यावे.

५. उक्त नमूद ५ अधिकारी / कर्मचा-यांना सातव्या वेतन आयोगाच्या थकबाकीचे तीन हप्ते एकत्रित अदा करण्यास सहमती देण्यात येत आहे. तसेच उर्वरित थकीबाकीचे दोन हप्ते उपरोक्त नमूद शासन निर्णय / शासन परिपत्रकान्वये करण्यात यावेत.

६. सदरचा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ५६/२०२३/सेवा-९, दिनांक १४.०२.२०२३ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

७. शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संकेताक २०२३०६०८१७४२४७५४२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by BABASAHEB S KHANDARE
Date: 2023.06.08 17:45:20 +05'30'

**( बाबासाहेब स. खंदारे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव,
२) मा. उप मुख्यमंत्री यांचे सचिव
३) मा.मंत्री (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
४) मा.मंत्री (शालेय शिक्षण) यांचे खाजगी सचिव,
५) मा.विरोधी पक्ष नेता, विधानसभा/विधानपरिषद,

६) सर्व सन्माननीय विधानसभा/विधानपरिषद सदस्य,
७) मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय,मुंबई यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक
८) मा. प्रधान सचिव (शालेय शिक्षण) यांचे स्वीय सहायक,
९) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक
१०) आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे,
११) शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक) महाराष्ट्र राज्य, पुणे,
१२) शिक्षण उपसंचालक, नाशिक विभाग, नाशिक,
१३) प्राचार्य, भोसला मिलीटरी स्कूल, नाशिक-४२२ ००५.
१४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर,
१५) महालेखापाल (लेखापरिक्षा) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर,
१६) महालेखापाल (स्थानिक निवासी लेखा परिक्षा व लेखा) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर,
१७) संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
१८) शिक्षणाधिकारी (प्राथमिक /माध्यमिक), जिल्हा परिषद, नाशिक,
१९) कोषागार अधिकारी (पुणे / नाशिक),
२०) वित्त विभाग (सेवा-९), मंत्रालय,मुंबई,
२१) कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प/ टीएनटी-३), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय,मुंबई,
२२) निवडनस्ती.